बाबा ह्यांनीं गुलसराईचीं राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं. त्यांची कारकीर्द सुमारें तेरा चौदा वर्षें चालून ते नुकतेच गेल्या वर्षांत परलोकवासी झाले आहेत. त्यांच्या पश्चात् त्यांचे तीन पुत्र आहेत. राजेबहादराचे दुसरे चिरंजीव सीतारामराव नानासाहेब व बाळकृष्णराव भाऊसाहेब हेही मोठे कर्ते पुरुष असून बुंदेलखंडात त्यांचा मोठा लौकिक आहे. श्रीमंत सीतारामराव नानासाहेब ह्यांनीं ग्वाल्हेर संस्थानात अनेक महत्वाचीं कामें केलीं आहेत व बाळकृष्णराव भाऊसाहेब ह्यांनींही बिजावर वगैरे संस्थानात प्रधानपद धारण करून अनेक पराक्रम गाजविले आहेत. ह्यांचे धाकटे बंधु कृष्णरावसाहेब व रघुनाथरावसाहेब हेही सद्गुणी आहेत. बाळकृष्णराव भाऊसाहेबांचे चिरंजीव माधवरावसाहेब हे कै॰ जयरामपंतदादास दत्तक दिले आहेत. हे फार सुस्वभावी, रसिक आणि बुद्धिमान् असून अलहाबाद विश्वविद्यालयाचे एक नामांकित पदवीधर आहेत. त्यांची योग्यता व विद्वत्ता लक्षात घेऊन त्यास वायव्य प्रांताच्या लेफ्टनंट गव्हरनरांनीं डेपुटी कलेक्टराच्या जागेवर सन्मानपूर्वक नियुक्त केलें आहे. सांप्रत ते बांदा येथें त्या महत्वाच्या हुद्यावर विराजमान असून आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजावीत आहेत, आणि सर्व प्रजेस व सरकारास आपल्या अगच्या उत्तम गुणांनीं फार प्रिय झाले आहेत.

असो. शेवटीं ज्या लोकोत्तर शौर्यशाली पुरुषानें आपल्या अद्वितीय गुणांनी बुंदेलखंडात मराठ्यांची राज्यसत्ता वृद्धिंगत केली व मराठ्यांचा वैभवदिनकर बुंदेलखंडात प्रकाशित केला त्याच्या कर्तृत्वाचें अत्यल्प स्मारक जें गुलसराई संस्थान तें ब्रिटिश सरकारच्या कृपेनें सदैव उत्तम स्थितींत असो व त्यात उत्पन्न होणारीं नररत्नें आपल्या अलौकिक तेजानें अखिल भरतखंडास भूषणभूत होवो अशी परमेश्वराजवळ सविनय प्रार्थना आहे.

# परिशिष्ट. अ.

## गोविंदपंत बुंदेल्यांचा वंशवृक्ष.

**विठ्ठलभट खेर नेवरेकर**
(मूळपुरुष)
|
नरसोपंत
|
गोविंद
|
गणेश
|
गोविंद
|
बाळाजी
|
**गोविंदपंत बुंदेले**
(दत्तक बुरमाडकर खेर यांचे वंशांतील
बुंदेलखंडांतील पहिले सुभेदार संवत् १७८६–१८१७)

**बाळाजी गोविंद**
उर्फ
**थोरले बाबासाहेब**
सागर संस्थानचे अधिपति
संवत् १८१७–१८५६)
|
**रघुनाथराव आबासाहेब**
(संवत् १८५६–१८७८.)
|
**बळवंतराव बाबासाहेब**
दत्तक। रामचंद्र गणेश खेर पथरियावाले
यांचे चिरंजीव)
|
**रघुनाथराव**
क, हे जबलपुरास असून यांस इंग्रज
रकाराकडून सालीना ५००० रुपये
लिटिकल पेनशन मिळत असते)

**गंगाधर गोविंद**
उर्फ
**धाकटे बाबासाहेब**
(जालवण संस्थानचे अधिपति
संवत् १८१७–१८५८)
|
**गोविंदराव नानासाहेब**
(संवत् १८५८–१८७८)
|
**बाळाजी गोविंद**
(संवत् १८७८–१८८८)
|
**राव गोविंदराव**
(दत्तक, संवत् १८८८–१८९८
यांच्या पश्चात् जालवण संस्थान
खालसा झालें)

# परिशिष्ट. ब.

## गुळसराईवाले खेर ह्यांचा वंशवृक्ष.




नरसिंहपंत खेर कुरमाडकर ( मूळपुरुष )

- **गोविंदपंत** ( ह्यास विठ्ठलभट खेर नेवरेकर, ह्यांचे वंशात बाळाजी गोविंद यांस दत्तक दिले. हेच बुंदेलखंडचे पहिले सुभेदार होत. )
- सताजीपंत
  - दिनकरराव
- रामाजीपंत
- विठ्ठलपंत
- काशीपंत ( हे बुंदेलखंडात मामलतदार होते )
- **बाबूराव** ( हे पुण्याच्या दरबारी बुंदेलखंडचे वकिलीवर होते )
  - **दिनकररावअण्णा** (दत्तक; गुळसराई संस्थानचे मूळपुरुष ) (संवत् १८३०–१८८९.)
    - बाळकृष्णभाऊ
      - आत्मारामबाबा (दत्तक; केशवरावाचे पुत्र)
    - **केशवराव राजेबहादूर** (संवत् १८८९–१९३७.)
      - शिवरामपंत (मयत )
      - जयरामपंत (मयत )
      - **आत्मारामबाबा** (संवत् १९३७–१९५० )
        - गोविंदराव
        - नारायणराव
        - भास्करराव
      - सखारामपंत (मयत.)
      - **सीतारामनाना** (ह्यांस ४ मुलगे आहेत )
      - बाळकृष्णराव
        - माधवराव
      - गंगाधरपंत
      - कृष्णराव
      - रघुनाथराव
    - जनार्दन